**महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियान**
**भंडारा शहराच्या मलनिस्सारण (टप्पा-१) प्रकल्पास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- नगरो-२०२१/प्र.क्र.२१६/नवि-३३**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
**दिनांक :- १३ सप्टेंबर, २०२१**

वाचा:-

१. शासन निर्णय, नगर विकास विभाग क्र: नगरो २०१४/प्र. क्र.११९/नवि-३३, दिनांक २१ ऑगस्ट, २०१४.
२. शासन निर्णय, नगर विकास विभाग क्र: नगरो-२०१५/प्र.क्र.६४/नवि-३३, दिनांक २७ मे, २०१६.
३. शासन निर्णय नगर विकास विभाग क्र: नगरो-२०१६/प्र.क्र.३२८/नवि-३३, दिनांक ०४ ऑक्टोबर, २०१६.
४. शासन परिपत्रक, नगर विकास विभाग क्र: संकिर्ण-२०१६/प्र.क्र.२८/नवि-३३, दिनांक १४ फेब्रुवारी, २०१७.
५. शासन परिपत्रक, नगर विकास विभाग क्र: संकिर्ण-२०१६/प्र.क्र.२५९/नवि-३३, दिनांक ३० नोव्हेंबर, २०१७.
६. नगरपरिषद प्रशासन संचालनालयाचे क्र.नपप्रसं/नगरोत्थान/भंडारा भु.ग./का.०७/ २०२१/२९५३, दिनांक २७ ऑगस्ट, २०२१.
७. दिनांक ०६ सप्टेंबर, २०२१ रोजी झालेल्या महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियानांतर्गत प्रकल्प मान्यता व सनियंत्रण समितीच्या बैठकीचे इतिवृत्त.
८. शासन परिपत्रक, नगर विकास विभाग क्र: नगरो-२०१८/प्र.क्र.५१०/नवि-३३, दिनांक ३१ डिसेंबर, २०१८.

प्रस्तावना:-

राज्यातील नागरी भागात मुलभूत पायाभूत सुविधा पुरविण्यासाठी व त्यांचा दर्जा वाढविण्याकरिता संदर्भाधीन क्रमांक १ येथील शासन निर्णयाच्या तरतूदीन्वये महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियान राबविण्यात येत आहे.

०२. महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान अभियानांतर्गत **भंडारा नगरपरिषदेचा मलनिस्सारण (टप्पा-१) प्रकल्प** नगरपरिषद प्रशासन संचालनालयामार्फत संदर्भाधीन क्र. ५ च्या पत्रान्वये राज्यस्तरीय मान्यता समितीकडे मान्यतेकरीता सादर करण्यात आला होता. या प्रकल्पास मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नागपूर यांनी चालू दरसूचीनुसार तांत्रिक मान्यता दिलेली आहे. त्याअनुषंगाने राज्यस्तरीय प्रकल्प मान्यता समितीने

दिनांक ०६ सप्टेंबर, २०२१ रोजी झालेल्या बैठकीमध्ये केलेल्या शिफारसीनुसार सदर प्रकल्पास प्रशासकीय मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियानांततर्गत सादर करण्यात आलेल्या **भंडारा नगरपरिषदेच्या मलनिस्सारण (टप्पा-१) प्रकल्पास** संदर्भाधीन शासन निर्णयातील अटी व तरतूदीच्या व महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने दिलेल्या तांत्रिक मान्यतेच्या अधीन राहून खालील विवरणपत्रात नमूद केल्यानुसार या शासन निर्णयाद्वारे मंजूरी देण्यात येत आहे.

०२. मलनिस्सारण प्रकल्पाची अंमलबजावणी करण्यासाठी निधीची मर्यादा विचारात घेऊन तसेच मलप्रक्रिया क्षमता प्राधान्याने निर्माण करण्यावर भर देण्यासाठी मलनिस्सारण प्रकल्पाची अंमलबजावणी दोन टप्प्यामध्ये करण्याचे धोरण राज्य शासनाने शासन निर्णय दिनांक ३० नोव्हेंबर, २०१७ (परिच्छेद क्र.४), तसेच संदर्भाधीन क्र. ८ येथील शासन निर्णय दिनांक ३१ डिसेंबर, २०१८ अन्वये स्वीकारले आहे. या धोरणानुसार प्रथम टप्प्यामध्ये भविष्यातील गरजेनुसार मलप्रक्रिया व्यवस्था निर्माण करून सध्या निर्माण होणाऱ्या सांडपाण्यावर प्राधान्याने प्रक्रिया करण्यात यावी. संपूर्ण सांडपाण्यावर प्रक्रिया करण्यासाठी आवश्यक असलेली सांडपाणी प्रक्रिया क्षमता (STP Capacity) पहिल्या टप्प्यात मंजूर करण्यात यावी. यामध्ये ट्रंकमेन, पंपिंग स्टेशन, मलशुद्धीकरण केंद्र व नालाबंध यांचा समावेश असेल. त्यासोबत त्या शहरातील एकूण वेगवेगळ्या प्रभागापैकी काही प्रभागातील सांडपाणी गोळा करण्याची व्यवस्था (Collection System) देखील घेण्यात यावी. उर्वरित प्रभागाकरिता मुख्य वाहिनीद्वारे (Trunk Main) सांडपाणी एका नाल्यात एकत्रित करण्यात यावे व असा नाला मलशुद्धीकरण केंद्राजवळ (STP) अडवून (Nala Interception) त्या ठिकाणी असे सांडपाणी मलशुद्धीकरण केंद्रामध्ये घेऊन त्यावर प्रक्रिया करण्यात यावी. दुसऱ्या टप्प्यामध्ये मलवाहिन्यांची व्यवस्था निर्माण करण्यात येऊन प्रथम टप्प्यामध्ये निर्माण केलेल्या मलप्रक्रिया व्यवस्थेस जोडण्यात यावी. या टप्प्यात द्वितीयस्तरीय मलवाहिन्यांचा समावेश असेल, असे धोरण राज्य शासनाने स्वीकारले आहे. **यानुसार टप्पेनिहाय अंमलबजावणी करताना भंडारा शहराच्या संपूर्ण मलनिस्सारण प्रकल्पास सद्यस्थितीस तत्वत: मान्यता देण्यात येत आहे**. त्यापैकी उपरोक्त धोरणानुसार पहिल्या टप्प्यातील योजनेस खालील विवरण पत्रात नमूद केल्यानुसार या शासन निर्णयाद्वारे प्रशासकीय मंजूरी देण्यात येत आहे. या प्रकल्पातील उपांगे व त्यांचे किंमतीचे विवरण पुढीलप्रमाणे आहे :-

| Sr. No. | Description | Amount in Rs. |
|---|---|---|
| | **Phase-1** | |
| 1 | Working Survey (Zone - 1, 2 & 3) | 704748 |
| 2 | Sewage Network Zone 1 & 2 (DWC 150-250 mm L=73.531 Km,<br>RCC NP-3 300-800 L = 6.624 Km Total Length L = 80.155 Km) | 345268868 |
| 3 | House Hold Connection Zone 1 & 2 (No. of Properties = 11,805) | 238461758 |
| 4 | Utility Shifting Zone - 1 & 2 | 6572774 |
| 5 | Wet Well | |
| 5a | Wet Well at STP Premises with overhead Pump House<br>(Wet Well - 1) 8 m Dia & 8.45 m Depth | 7995379 |

| | | |
|---|---|---|
| 5b | Wet Well at Santaji Nagar Premises with overhead Pump House (Wet Well - 2) 6m Dia & 10.87m Depth | 7256724 |
| 5c | Diversion Weir with Intake Chamber, Screen Chamber, Grit Chamber & Outlet Chamber | 9099046 |
| 5d | Wet Well at Nagpur Highway with Overhead Pump House (Wet Well - 3) 6m Dia & 9.87m Depth | 6791202 |
| 6 | Pumping Machinery | |
| 6a | Pumping Machinery at Wet Well - 1 (7 No. Submersible Pump 40 HP 272229 LPH, H - 17 & Considering ½ DWF Flow) | 18062143 |
| 6b | Pumping Machinery at Wet Well - 2 (2 No. Submersible Pump 30 HP 138167 LPH, H - 27 & Considering ½ DWF Flow, 2 No. Submersible Pump 70 HP 276333 LPH, H - 34 & Considering 1 DWF Flow & 1 No. Submersible Pump 260 HP 621750 LPH, H - 60 & Considering 2.25 DWF Flow) | 12464430 |
| 6c | Pumping Machinery at Wet Well - 3 (2 No. Submersible Pump 20 HP 93417 LPH, H - 27 & Considering ½ DWF Flow, 2 No. Submersible Pump 50 HP 186833 LPH, H - 34 & Considering 1 DWF Flow & 1 No. Submersible Pump 180 HP 420375 LPH, H - 60 & Considering 2.25 DWF Flow) | 9983735 |
| 7 | Pumping Main | |
| 7a | 500 MM Φ DI K-9 (Pumping Main) From WW - 1 to STP, L = 50 M | 381689 |
| 7b | 350 MM Φ DI K-9 Pipe (Pumping Main) From WW - 2 to Shastri Chowk, L = 1525 M | 7273585 |
| 7c | 350 MM Φ DI K-9 Pipe (Pumping Main) From WW - 3 to Shastri Chowk, L = 3550.8 M | 16370426 |
| 7d | 450 MM Φ DI K-9 Pipe (Pumping Main) From T point Shastri Chowk to WW - 1 (STP) L = 3465 M | 22261401 |
| 8 | Maintenance Equipment's and Machinery | 11100000 |
| 9 | Sewerage Treatment Plant :- Capacity 13.5 MLD - SBR Technology | 148011073 |
| 10 | Effluent Discharge Pipe Line 900 mm Φ RCC NP - III From STP to Nallah L = 1043 m & Effluent Storage Tank | 10522303 |
| 11 | Road Restoration Zone 1 & 2 | 154214844 |
| 12 | SCADA Cost | 3677024 |
| 13 | Annual Maintenance Cost STP | 3758565 |
| 14 | Annual Maintenance Cost (SCADA) | 808946 |
| | **Total Cost Rs.** | **1041040663** |
| | **Add 12% GST Charges** | **124924880** |
| | **Total Project cost of Phase -I** | **1165965543** |
| | **Say (Rs in Cr)** | **116.60 Cr.** |
| | **प्रकल्प पूर्ण करण्याचा कालावधी** | **कार्यादेश दिनांका पासून २४ महिने** |

०२. **<u>भंडारा नगरपरिषदेच्या मलनिस्सारण (टप्पा-१) प्रकल्पाचा</u>** वित्तीय आकृतिबंध पुढीलप्रमाणे राहील:-

| अ. क्र. | नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेचे नाव | योजनेची मंजूर किंमत | राज्य शासनामार्फत अनुज्ञेय अनुदान (प्रकल्प किंमतीच्या ८५%) | नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेचा सहभाग (प्रकल्प किंमतीच्या १५%) |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | भंडारा नगरपरिषद | रु. ११६.६० कोटी | रु. ९९.११ कोटी | रु. १७.४९ कोटी |

**०३.** संदर्भाधीन क्रमांक १ येथील शासन निर्णयानुसार **भंडारा नगरपरिषदेच्या मलनिस्सारण (टप्पा-१) प्रकल्पास** खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मंजूरी देण्यात येत आहे:-

**अ) प्रकल्प कार्यान्वयन यंत्रणा :-**

१. सदर प्रकल्पाचे कार्यान्वयन **भंडारा नगरपरिषदेमार्फत** करणेत यावे.

२. सदर प्रकल्पासाठी शासन निर्णय दिनांक ०४ जून, २०१८ अन्वये विहित केल्यानुसार जास्तीत जास्त ३ टक्केच्या मर्यादेत शुल्क प्रदान करण्याच्या अधीन प्रकल्प व्यवस्थापन सल्लागाराची नियुक्ती नगर परिषदेने एक महिन्यात करावी. त्याबाबत आवश्यक ठराव नगरपरिषदेने करावा.

३. शासन निर्णय दिनांक ०४ जून, २०१८ अन्वये विहित केलेप्रमाणे व त्या शासन निर्णयातील तरतूदींच्या अधीनतेने प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार शुल्क (PMC Charges) संबंधित सल्लागारास **स्वनिधीतून** प्रदान करणे नगर परिषदेवर बंधनकारक राहील. त्याबाबत आवश्यक ठराव नगरपरिषदेने एक महिन्यात करावा.

४. सदर प्रकल्पास मान्यता देताना राज्यस्तरीय प्रकल्प मान्यता समितीने विहित केलेल्या सर्व अटींची पूर्तता करणे कार्यान्वयन यंत्रणेवर बंधनकारक राहील.

**ब) सुधारणांची पूर्तता:-** महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियानाच्या संदर्भाधीन क्र. १ च्या शासन निर्णयानुसार नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना खाली दर्शविलेल्या बंधनकारक व वैकल्पीक सुधारणा (रिफॉर्म) पूर्ण करणे आवश्यक राहिल. त्यापैकी ८० टक्के वैकल्पिक अटींची पूर्तता प्रकल्पाच्या दुसऱ्या वर्षापर्यंत करणे आवश्यक राहील.

**I) बंधनकारक सुधारणा:-**

१. प्रकल्प मंजूरीच्या पहिल्या वर्षात नगरपरिषदेने त्यांच्या कामकाजाचे पूर्ण संगणकीकरण करणे अनिवार्य राहील. यात प्रामुख्याने ई-गव्हर्नन्स, लेखा, जन्म-मृत्यू नोंद सुधारणा याची १०० टक्के अंमलबजावणी करणे बंधनकारक राहील.

२. उचित उपभोक्ता कर लागू करुन किमान ८० टक्के वसुली करणे.

३. नागरी क्षेत्रातील गरिबांसाठी अर्थसंकल्पात विवक्षित निधीची तरतूद करणे.

४. संबंधित स्थानिक नागरी स्वराज्य संस्थेने, द्विलेखा नोंद पद्धती सहा महिन्यात पूर्ण करणे आवश्यक राहील.

५. संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने त्यांच्या क्षेत्रातील मालमत्ता कराचे पुर्नमुल्यांकन झाले नसल्यास, प्रकल्प मंजूरीपासून पुढील एक वर्षाच्या कालावधीत ते पूर्ण करणे बंधनकारक राहिल.

६. संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने “घनकचरा व्यवस्थापन नियम २०१६” च्या तरतूदीनुसार त्यांच्या कार्यक्षेत्रातील घनकचरा व्यवस्थापन उचित रित्या करणे बंधनकारक राहील.

७. संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने त्यांच्या कार्यक्षेत्रातील मालमत्ता कराची व पाणीपट्टीची वसुली पहिल्या वर्षी किमान ८०% करणे बंधनकारक राहील. त्यापुढील वर्षात सदरहू वसूली उर्वरीत ९०% या प्रमाणात करणे आवश्यक राहील.

**II) <u>वैकल्पिक सुधारणा:-</u>**

१. मलनिस्सारण प्रकल्प हाती घेतलेल्या नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी नागरी भागातील सांडपाण्याचे पुनर्प्रक्रिया व पुर्नवापर करण्याबाबतच्या घटकांचा समावेश त्यांच्या सविस्तर प्रकल्प अहवालामध्ये करावा.

२. संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी त्यांच्या मालकीच्या इमारतीवर पर्जन्यजल संचय करावे.

३. संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने नियमितपणे जल लेखापरिक्षण (वॉटर ऑडीट) करुन घ्यावे. जललेखापरिक्षण अहवालात नमूद त्रूटींचे निराकरण करण्याबाबत संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने, त्यासंदर्भात आवश्यक कृती कार्यक्रम तयार करुन विहित कालावधीत त्रूटींची पूर्तता करणे आवश्यक राहील.

**क) <u>निधी वितरणाची कार्यपद्धती:-</u>**

१. महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियानामधील प्रकल्पांसाठी प्रशासकीय मान्यता दिल्यानंतर संबंधित नागरी स्वराज्य संस्थेने प्रकल्पाचा आर्थिक आराखडा (Financial Closure Report) नगर विकास विभागास सादर करावा. त्यानंतर व कार्यादेश दिल्यानंतर सदर प्रकल्पासाठी पहिल्या हप्त्याचा निधी वितरीत करण्यात येईल.

२. महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियान अंतर्गत मंजूर प्रकल्पास पहिल्या हप्त्याचा निधी वितरीत केल्यानंतर तो हप्ता व स्थानिक स्वराज्य संस्थेचा त्याप्रमाणातील स्वहिस्सा हा एकत्र निधी, शासनाच्या प्रचलित धोरणानुसार विहित केलेल्या बँकांमध्ये, स्वतंत्र खाते उघडून ठेवणे अनिवार्य राहील.

३. महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियानांतर्गत मंजूर प्रकल्पासाठी स्वहिश्याचा निधी उभारताना नागरी स्थानिक स्वराज्य संस्थानी त्यांना राज्य शासनाकडून प्राप्त होणाऱ्या १४ व्या वित्त आयोग (मुलभूत व कार्यात्मक) अनुदानाशी तसेच, १५ व्या वित्त आयोगाच्या अनुदानाशी एककेंद्राभिमुख (Convergence) करणे आवश्यक राहील. यासाठी त्यांनी यामधून मिळणारा निधी चिन्हांकीत करुन ठेवणे त्यांच्यावर बंधनकारक राहील.

४. राज्य शासनाने वितरीत केलेल्या पहिल्या हप्त्याच्या अनुदानाची रक्कम व त्या प्रमाणात नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने जमा केलेली पहिल्या हप्त्याची स्वहिश्याची रक्कम अशा एकत्रित रकमेच्या ७५ टक्के खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र, नगरपरिषद प्रशासन संचालनालयामार्फत शासनास सादर केल्यानंतरच राज्य शासनाचा दुसरा हप्ता वितरीत केला जाईल.

५. नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी दुसऱ्या हप्त्याची मागणी करण्याचा प्रस्ताव नगरपरिषद प्रशासन संचालनालयामार्फत शासनास सादर करावा. नगरपरिषद प्रशासन संचालनालय यांनी प्रस्तावांची छाननी करून उचित अभिप्रायांसह शासनास प्रस्ताव सादर करावा.

६. या अभियानांतर्गत मंजूर प्रकल्पास राज्य शासनाने संबंधित स्थानिक स्वराज्य संस्थेस राज्य शासनाचा हिस्सा मंजूर केल्यानंतर त्यामधून खर्च करताना प्रत्येक टप्प्यावर प्रत्येक देयकामध्ये राज्य शासनाच्या हिश्श्यामधून जेवढी रक्कम प्रदान होणार असेल त्याप्रमाणात संबंधित स्थानिक स्वराज्य संस्थेने स्वहिश्श्याची रक्कम प्रदान करावी. यामुळे अशा योजनेत स्थानिक स्वराज्य संस्थेचा हिस्सा एकाच वेळी भरण्याची वेळ येणार नाही.

७. महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियानामधील मंजूर प्रकल्पांसाठी राज्य शासनाने मंजूर केलेला निधी फक्त त्याच प्रकल्पासाठी वापरता येईल व तो अन्य कोणत्याही कामासाठी वळवता किंवा वापरता येणार नाही. अशाप्रकारे मूळ निधी किंवा त्यावरील व्याज कायम स्वरुपी किंवा तात्पुरत्या स्वरुपात अन्यत्र वळविणे ही गंभीर स्वरुपाची आर्थिक अनियमितता मानली जाईल, त्यासाठी संबधित स्थानिक स्वराज्य संस्था/संबधित अधिकारी कारवाईस पात्र ठरतील.

**ड) <u>निविदा प्रक्रिया, कार्यादेश व कार्यान्वयन :-</u>**

१. या अभियानांतर्गत मंजूर प्रकल्पास प्रशासकीय मान्यता दिल्यानंतर ७ दिवसाच्या कालावधीत निविदा काढणे व तीन महिन्याच्या कालावधीत कार्यादेश देणे व ९१ व्या दिवसापूर्वी कामाचा प्रत्यक्ष प्रारंभ करणे बंधनकारक राहील. या प्रकल्पासाठी कार्यान्वयन यंत्रणा भंडारा नगरपरिषद आहे. त्यामुळे या कालमर्यादेचे पालन करण्याची संपूर्ण जबाबदारी मुख्याधिकारी, भंडारा नगरपरिषदेची राहील.

२. सदर प्रकल्पाची निविदा प्रक्रिया राबविताना संदर्भाधीन क्रमांक ३ च्या शासन निर्णयातील सूचनाचे तंतोतंत पालन करणे कार्यान्वयन यंत्रणेस बंधनकारक राहील.

३. यानुसार कार्यवाही न झाल्यास संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेस अशा प्रकल्पासाठी मंजूर केलेला निधी त्यावरील व्याजासह शासनास परत करणे आवश्यक राहील.

४. सदर **<u>मलनिस्सारण प्रकल्प</u>** पूर्ण करताना राज्य शासनाने संदर्भाधीन क्र. ४ येथील शासन परिपत्रकान्वये विहित केलेल्या कार्यपध्दतीचा अवलंब करणे बंधनकारक राहील.

५. सदर प्रकल्पासाठी विहित केलेल्या कार्यमर्यादेत प्रकल्पाचे काम पूर्ण करणे संबंधित कार्यान्वयन यंत्रणेस बंधनकारक राहील.

६. सदर प्रकल्पाच्या कामाचे कार्यादेश दिल्यानंतर प्रकल्पामध्ये समाविष्ट असलेल्या पाईप्स इत्यादी वस्तुंची खरेदी ही प्रकल्पाच्या आवश्यकतेनुसार प्रकल्प व्यवस्थापन सल्लागाराच्या मार्गदर्शनाने करावी.

७. सदर प्रकल्पासाठी सुरुवातीला अनावश्यक स्वरुपात **कोणत्याही प्रकारच्या पाईप्सची खरेदी करणे व त्यासाठी प्रकल्प निधीतून प्रदान करणे ही गंभीर स्वरुपाची वित्तिय अनियमितता**

समजण्यात येईल व त्यासाठी **संबंधित कार्यान्वयन यंत्रणा व प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार यंत्रणेस जबाबदार** धरण्यात येईल.

**इ) प्रकल्पांचे त्रयस्थ तांत्रिक परिक्षण :-**

- महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियानातंर्गत" मंजूर प्रकल्पांचे, अंमलबजावणीच्या विविध टप्प्यावर वेळोवेळी शासनाने विहीत केलेल्या यंत्रणेंपैकी एका यंत्रणेकडून "त्रयस्थ तांत्रिक परिक्षण" (थर्ड पार्टी टेक्नीकल ऑडीट) संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने करुन घेणे बंधनकारक राहिल. तसेच प्रकल्पांतर्गत दुसरा हप्ता मंजूर करण्याबाबतचा प्रस्ताव सादर करताना सदर "त्रयस्थ तांत्रिक परिक्षणाचे"गुणवत्तेबाबतचे प्रमाणपत्र सादर करणे आवश्यक राहील. तद्नंतरच दुसऱ्या हप्त्याचा निधी वितरीत केला जाईल.

**फ) प्रकल्पासाठी आवश्यक स्वहिश्याचा निधी भरण्याकरिता कर्ज उभारणी:-**

१. महाराष्ट्र सुवर्णजयंती नगरोत्थान महाभियानातंर्गत" मंजूर प्रकल्पांसाठी संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना त्यांचा स्वहिश्याचा निधी उभारण्यासाठी "राष्ट्रीयीकृत बँकांकडून" तसेच "मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण" (एमएमआरडीए), "महाराष्ट्र नागरी पायाभूत सुविधा विकास कंपनी मर्यादीत" (एमयुआयडीसीएल) व शासन मान्य वित्तिय संस्थांकडून कर्ज घेण्याची मुभा राहील.

२. तथापि, वित्तिय संस्थांकडून कर्ज घेताना त्यासंदर्भात आवश्यक त्या बाबींची पूर्तता केल्यानंतर प्रचलित नियमांच्या अधीन राहून कर्ज घेण्याबाबत शासनाची परवानगी घेण्यात येईल. तसेच शासनाच्या विहित प्रचलित नियमांच्या अधीन राहून आवश्यक कार्यवाही करणे बंधनकारक राहील.

**ग) प्रकल्पाची देखभाल व दुरूस्ती:-**

१. महाराष्ट्र सुवर्णजयंती नगरोत्थान महाभियानांतर्गत मंजूर प्रकल्पाच्या देखभाल व दुरुस्तीबाबत आवश्यक ते नियोजन संबंधित कार्यान्वयन यंत्रणेमार्फत करण्यात यावे, जेणेकरुन सदर प्रकल्पांतून होणारी फलनिष्पत्ती ही शाश्वत राहील.

२. सदर योजनेची देखभाल व दुरूस्ती करण्याची जबाबदारी संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेची राहील. योजनेच्या देखभाल व दुरूस्तीसाठी कोणताही निधी शासनाकडून प्राप्त होणार नाही.

**ह) इतर बंधनकारक अटी व शर्ती :-**

१. राज्य शासनामार्फत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेसाठी प्रकल्प मंजूर झाल्यानंतर, मूळ प्रकल्प किंमतीमध्ये कोणत्याही कारणास्तव वाढ झाल्यास त्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित **नागरी**

**<u>स्थानिक स्वराज्य संस्थेची</u>** राहील. राज्य शासनामार्फत त्याकरिता कोणतेही वाढीव अनुदान उपलब्ध केले जाणार नाही.

२. संदर्भाधीन क्र. १ ते ४ या शासन निर्णयातील तरतूदी तसेच सर्व अटी व शर्तींची पूर्तता करणे संबंधित कार्यान्वयन यंत्रणेवर बंधनकारक राहील.

३. सदर प्रकल्पातून अधिकाधिक फलनिष्पत्ती साध्य करण्यासाठी या मलनिस्सारण प्रकल्पाचे कार्यादेश देण्यासाठी महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियानांतर्गत भंडारा नगरपरिषदेच्या क्षेत्रात प्रगती पथावर असलेल्या पाणी पुरवठा प्रकल्पाची किमान ६० टक्के भौतिक व आर्थिक प्रगती साध्य करणे मुख्याधिकारी, भंडारा नगरपरिषद यांच्यावर बंधनकारक राहील.

४. सदर प्रकल्पास मंजूरी देताना नगरपरिषदेने सादर केलेला वित्तिय तपशील विचारात घेता या प्रकल्पासाठी नगरपरिषदेच्या स्वहिश्श्याची रक्कम उभारण्यासाठी नगरपरिषदेने मुन्फ्रामार्फत कर्ज घेणे आवश्यक राहील. त्याबाबत आवश्यक ठराव नगरपरिषदेने करावा.

०४. या पहिल्या टप्प्यातील प्रकल्पाची अंमलबजावणी पूर्ण झाल्यानंतर दुसऱ्या टप्प्यात उर्वरित प्रभागातील (Zone) मलवाहिन्यांचा समावेश असलेला (टप्पा-२) प्रकल्प स्वतंत्रपणे मंजूर करण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्यांचा संगणक संकेतांक २०२१०९१३१३१३२३९८२५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

PANDURANG JOTIBA JADHAV

Digitally signed by PANDURANG JOTIBA JADHAV
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=300d785e12fdc19db0612f1ffdf83e54efe7da2b1bc63d18df8e09b3c7eece65, cn=PANDURANG JOTIBA JADHAV
Date: 2021.09.13 13:37:28 +05'30'

**( पां.जो.जाधव )**

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मंत्री नगर विकास विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. राज्यमंत्री नगर विकास विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. अप्पर मुख्य सचिव, वित्त विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
४. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
५. अपर मुख्य सचिव, पाणीपुरवठा विभाग यांचे स्वीय सहायक, गो. ते. रुग्णालय, मुंबई.
६. प्रधान सचिव, नगर विकास विभाग (२) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
७. व्यवस्थापकीय संचालक, एम.यु.आय.डी.सी.एल, मुंबई.
८. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
९. महासंचालक, महाराष्ट्र ऊर्जा विकास प्राधिकरण (मेडा), पुणे.

१०. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई.

११. विभागीय आयुक्त, नागपूर.

१२. जिल्हाधिकारी, भंडारा.

१३. मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नागपूर विभाग.

१४. जिल्हा प्रशासन अधिकारी, भंडारा.

१५. मुख्याधिकारी, भंडारा नगरपरिषद, जि. भंडारा.

१६. निवडनस्ती, नवि-३३.